**मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी-२०२१/प्र.क्र.३१/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २४ एप्रिल, २०२४.

**संदर्भ :-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर, २०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०२०/ प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०.
३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.०२ नोव्हेंबर, २०२३.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. बीसीसी -२०१९/प्र.क्र.५८१ ए/१६-ब, दि.१४ डिसेंबर, २०२२.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे क्र.मुअ(पुणे)/आस्था-१/ २३७३/२०२४, दि.०१ मार्च, २०२४ रोजीचे पत्र.
६) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, पुणे यांचे क्र.पशा/जी४३/पमं/३९१९/ २०२४, दि.१५ एप्रिल, २०२४ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांनी अनुसुचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यामुळे त्यांच्यासाठी अधिसंख्य पदे निर्माण करुन त्यांना ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त होतील त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. सदर कर्मचाऱ्यांसाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाची मुदत संपुष्टात आल्यामुळे त्यांच्या अधिसंख्य पदास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असलेल्या खालील तक्त्यात नमूद कर्मचाऱ्यांचा अधिसंख्य पदावरील कालावधी संपुष्टात आल्यामुळे त्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ अन्वये ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन पुढील ११ महिने किंवा त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचा-यांचे नाव | पदनाम व गट | सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ नुसार मुदतवाढीचा कालावधी |
|---|---|---|---|
| १ | श्री. नितीन भिकन सैंदाणे | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, गट-क | दि.२८/०१/२०२४ ते दि.२७/१२/२०२४ |
| २ | श्री. मनिष विलासराव चव्हाण | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, गट-क | |
| ३ | श्रीम. किर्ती किरण कोसके | वरिष्ठ लिपिक, गट-क | |
| ४ | श्री.आप्पासाहेब मल्लेश कोळी | कनिष्ठ लिपिक, गट-क | |
| ५ | श्री. अविनाश बलभीम कांबळे | आरेखक, गट-क | |
| ६ | श्री. सत्यवान अरविंद चव्हाण | वाहन चालक, गट-क | दि.०७/०४/२०२४ ते दि.०६/०३/२०२५ |
| ७ | श्री. मोहन महादेव धुमाळ | शिपाई, गट-ड | दि.२८/०१/२०२४ ते दि.२७/१२/२०२४ |
| ८ | श्री. चंद्रकांत शंकर धुमाळ | चौकीदार, गट-ड | |
| ९ | श्री. किरण रतन चव्हाण | चौकीदार, गट-ड | |
| १० | श्री. सतिश रंगराव कोरे | नाईक, गट-ड | |
| ११ | श्री. उमेश रामचंद्र माने | नाईक, गट-ड | |
| **१२** | **श्री. बजरंग चन्नापा कोळी** | **नाईक, गट-ड** | **दि.२८/०१/२०२४ ते दि.३१/०३/२०२४** |

**२.** वर नमूद कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्च ते ज्या कार्यालयात कार्यरत राहतील, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधीत वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच वर नमूद कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदावरील मुदतवाढीचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर किमान १५ दिवसात प्रस्ताव अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, पुणे यांनी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांच्या मान्यतेने शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

**३.** अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, पुणे यांनी सादर केलेल्या प्रस्तावातील श्री. सत्यवान अरविंद चव्हाण, वाहन चालक यांच्यासाठी निर्माण करण्यात आलेल्या अधिसंख्य पदाची मुदत दि.०५/०४/२०२४ रोजी संपुष्टात आल्यामुळे त्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ मधील तरतुदीनुसार ०१ दिवसाचा तांत्रिक खंड देऊन दि.०७/०४/२०२४ पासून दि.०६/०३/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

**४.** श्री.बजरंग चन्नापा कोळी, नाईक हे दि.३१/०३/२०२४ रोजी सेवानिवृत्त झाले असल्यामुळे त्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ मधील तरतुदीनुसार त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१४/१२/२०२२ या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०४२४१६५४०९२२१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUDEEP SAHADEO REWALE

Digitally signed by SUDEEP SAHADEO REWALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=41570e676233403355caab8cc6f4cb08480e2e80c6afc2b733ca211905e1d434, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B5B2DA9CB10BA8C6D55247B5E56FE2206FFE50CB862E223A178F18C4C5BF7C34, cn=SUDEEP SAHADEO REWALE
Date: 2024.04.24 17:06:26 +05'30'

**( सुदिप सहदेव रेवाळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-** १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळ, पुणे.
३) अपर मुख्य सचिव (सा.बां.) /सचिव (रस्ते) व सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-II , महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/सांगली/सातारा/कोल्हापूर/सोलापूर.
७) कार्यासन सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती.